**महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतनेत्तर बाबीकरिता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे जूलै, २०२० ते सप्टेंबर, २०२० या तीन महिन्यांकरिता निधी वितरीत करणेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ-२०२०/प्र.क्र.२६/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०५ नोव्हेबर, २०२०.

वाचा :-

(१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६ एप्रिल,२०२०.
(२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. राअआ-२०२०/प्र.क्र.२६/का-९ दिनांक ११.०६.२०२०.
(३) महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.११/का-४/२०२०-२१ दि. ०६/१०/२०२० चे पत्र व सहपत्रे.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयास सन २०२०-२१ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल, २०२० ते जुन, २०२० या तीन महिन्यांचा वेतनेत्तर खर्च भागविण्याकरीता उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.४,४२,५००/-(चार लक्ष बेचाळीस हजार पाचशे फक्त ) निधी वितरीत करण्यात आला होता. आता अल्पसंख्याक आयोगाने संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये आयोगाच्या कार्यालयीन खर्चाकरीता (वेतनेत्तर) माहे जूलै, २०२० ते सप्टेंबर, २०२० या तीन महिन्याकरीता निधी मंजूर करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार अल्पसंख्याक आयोगाच्या कार्यालयीन खर्चाकरीता (वेतनेत्तर) माहे जूलै, २०२० ते सप्टेंबर, २०२० या तीन महिन्याकरीता निधी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षातर्गत एकूण रु.४४,२५,०००/- (अक्षरी रूपये चव्वेचाळीस लाख पंचवीस हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.-

२. उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२०-२१ च्या प्रथम तीन महिन्यांकरीता एप्रिल, २०२० ते जुन २०२० कालावधीकरीता अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०% म्हणजेच रु.४,४२,५००/- (अक्षरी रुपये चार लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त) एवढा निधी उपलब्ध असून, सदर (बीम्स) प्रणालीद्वारे मंत्रालयीन विभागांना अनुदान वितरित करण्यास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरुन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी प्रथम तीन महिन्यांकरीता (एप्रिल २०२० ते जुन, २०२०) अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०% म्हणजेच रु.४,४२,५००/- (अक्षरी रुपये चार लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त) एवढे वेतनेत्तर अनुदान संदर्भ क्र.२ दि.११.०६.२०२०

च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने कार्यालयीन खर्चा करीता माहे जूलै,२०२० ते सप्टेंबर,२०२० या कालावधी करीता उपलब्ध अनुदान मंजूर करण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन आयोगाच्या कार्यालयीन खर्चाकरीता अंर्थसंकल्पित तरतूदीच्या १० टक्के निधी मंजूर करुन उपलब्ध करुन दयावा अशी वित्त विभागास विनंती केली असता वित्त विभागाने एकूण अर्थसंकल्पीत निधीच्या २०% निधी रु. ८,८५,०००/- (एकूण अक्षरी रुपये आठ लाख पंच्याऐंशी हजार फक्त) एवढा उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीपैकी अल्पसंख्याक आयोगाने मागणी केल्यानुसार कार्यालयीन खर्चाकरीता (वेतनेतर) माहे जुलै २०२० ते सप्टेंबर, २०२० या कालावधीकरीता रु.४,४२,५००/- (एकूण अक्षरी रुपये चार लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. शासन निर्णय दि.११ जून, २०२० अन्वये वितरीत केलेल्या निधीपैकी खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र आयोगाने शासनास सादर सादर केले आहे. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाच्या वेतनेत्तर बाबीकरीता त्यांनी मागणी केल्याप्रमाणे माहे जुलै, २०२० ते माहे सप्टेंबर, २०२० या तीन महिन्याकरीता **अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०% म्हणजेच रु.४,४२,५००/- (अक्षरी रुपये चार लाख बेचाळीस हजार पाचशे फक्त)** इतके अनुदान, ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दिष्टाखाली खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

| अ. क्र. | तपशीलवार लेखाशीर्ष | सन २०२०-२१ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान (रु.) | तीनमाही साठी वितरित अनुदान (माहे जुलै, २०२० ते माहे सप्टेंबर, २०२०) (अर्थसंकल्पीय तरतुदीच्या २०%) (रु.) | माहे जुलै, २०२० ते माहे सप्टेंबर, २०२० करिता मंजूर अनुदान (अर्थसंकल्पीय तरतुदीच्या १०%) (रु.) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ६ |
| १ | ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | ४४,२५,०००/- | ८,८५,०००/- | ४,४२,५००/- |
| | **एकूण** | **४४,२५,०००/-** | **८,८५,०००/-** | **रु. ४,४२,५००/-** |
| | | | | **(अक्षरी रुपये चार लक्ष बेचाळीस हजार पाचशे फक्त)** |

४. सदर तरतुद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता, ते आहरण व संवितरण आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२०-२१ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाच्या खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी.

या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनांस सादर करणे तसेच संदर्भा क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

५. उपरोक्त निधी “मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावी.

६. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०१९/ प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६ एप्रिल,२०२० मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता होत असून, प्राप्त मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.”

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०५१८०५५८०११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.11.10 15:33:44 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती (कार्यासन-९).